सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था, अकोला या संस्थेच्या जिनिंग प्रेसिंग प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेखाली कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत शासकीय भाग-भांडवलाच्या पहिला हप्त्याची उर्वरित रक्कम मंजूर करणेबाबत (कोल्हे कमिटी)

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-१११४/प्र.क्र.२५/९-स,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

तारीखः- २७ फेब्रुवारी, २०१५

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-११२००४/प.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२००७.
२) शासननिर्णय (शुध्दीपत्रक) क्रमांक:प्रक्रिया-११२००४/प्र.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२०१०
३) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र दि.१२.५.२०१४
४) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अकोला यांचे पत्र क्र. वि-४/सम्यक/कृ.उ.प्र.स.सं./भा.भां.प्र./१५१४/२०१३ दि.६.३.२०१४ व दि.३०.४.२०१४.
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अंदाज२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३ दि.१.७.२०१४
६) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २७.१.२०१५
७) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अंदाज२०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि.९.२.२०१५

**प्रस्तावना:-**

सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., अकोला या संस्थेच्या रु.७१८.२० लक्ष किंमतीच्या जिनिंग प्रेसिंग प्रक्रिया प्रकल्प प्रस्तावाकरिता शासनाने मंजूर केलेल्या विहीत वित्तीय आकृतीबंधात खालीलप्रमाणे मंजूरी देण्यात आलेली आहे :-

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशील | टक्केवारी(प्रकल्प किंमतीच्या | ४:३६:६० या प्रमाणात शासनाने मंजूर केलेला आर्थिक आकृतीबंध |
|---|---|---|---|
| १ | बँक ऑफ महाराष्ट्रचे कर्ज | ३६% | १८०.०० |
| २ | क्वासी इक्विटी कॅपिटल | २४% | १५०.०० |

| अ. क्र. | तपशील | टक्केवारी(प्रकल्प किंमतीच्या | ४:३६:६० या प्रमाणात शासनाने मंजूर केलेला आर्थिक आकृतीबंध |
|---|---|---|---|
| ३ | राज्य शासनाचे भाग-भांडवल | ३६% | १८०.०० |
| **एकूण {१+२} :-** | | **९६%** | **५१०.००** |
| ४ | संस्थेचे स्व भाग-भांडवल | ०४% | २०८.२० |
| **एकूण {१+२+३} :-** | | **१००%** | **७१८.००** |

**२.** संबंधित संस्थेस बँक ऑफ महाराष्ट्र ने रु.१८०.०० लक्ष इतके कर्ज देण्याचे मान्य केलेले असून त्याबाबतचे मंजूरीपत्र दिलेले आहे. त्यामुळे संस्थेस कोणत्याही प्रकारची शासन हमी किंवा रा.स.वि.नि. कर्जाची आवश्यकता नाही. त्यास अनुसरून संदर्भीय दिनांक १२.१०.२००७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदर योजनेअंतर्गत विहीत करण्यात आलेल्या रु.५.०० कोटी इतक्या प्रकल्प किंमतीच्या मर्यादेत ३६% म्हणजे रु.१८०.०० लक्ष इतक्या शासकीय भाग-भांडवलाची मागणी केलेली आहे.

**३.** सदर संस्था ही विदर्भातील आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये कृषि प्रक्रिया करीता संबंधित ३ लेखाशिर्षाखाली प्रत्येकी १००.०० लक्ष प्रमाणे एकूण रु.३००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आलेली असून मा. राज्यपाल महोदय यांच्या निदेशाचे अनुषंगाने प्रादेशिकमंडळ निहाय वाटपानुसार विदर्भासाठी २३.०३%, मराठवाडयासाठी १८.७५% आणि उर्वरित महाराष्ट्रासाठी ५८.२२% इतकी तरतूद उपलब्ध आहे. विदर्भासाठी उपलब्ध हिश्यानुसार संबंधित संस्थेस सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पहिल्या हप्त्याची रु.२३,०३,०००/- इतकी रक्कम देय होती. तथापि, संबंधित संस्थेस रक्कम वितरित करताना वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ च्या परिपत्रकामध्ये केवळ ६०% रक्कम खर्चास मान्यता दिली असल्याने सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., अकोला या संस्थेस विहीत व वित्त विभागाने घातलेल्या अटींच्या अधीन राहून रु.१३.८२ लक्ष रक्कम संदर्भीय समक्रमांकाच्या दिनांक २७.१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आली आहे.

**४.** आता वित्त विभागाने संदर्भीय दिनांक ९.२.२०१५ च्या परिपत्रकान्वये योजनांतर्गत योजनांसाठी ७५% एवढया मर्यादेत निधी वितरित करण्यास दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., अकोला या संस्थेस पहिल्या हप्त्यात देय असलेल्या रक्कमेतील उर्वरित १५% म्हणजे रु.३.४५ लक्ष रक्कम विहीत व वित्त विभागाने घातलेल्या अटींच्या

अधीन राहून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय**

सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., अकोला या संस्थेला कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना अर्थसहाय्य योजनेअंतर्गत मंजूर वित्तीय आकृतीबंधानुसार **अनुज्ञेय असलेल्या शासकीय भाग-भांडवलाच्या रु.१८०.०० लक्ष रक्कमेपैकी** पहिल्या हप्त्यात देय असलेल्या आणि विदर्भाच्या हिश्श्याच्या रु.२३.०३ लक्ष रक्कमेपैकी संदर्भीय दिनांक २७.१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार **रु.१३,८२,०००/- इतकी** ६०% **रक्कम** वित्त विभागाने घातलेल्या अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे. वित्त विभागाने संदर्भीय दिनांक ९.२.२०१५ च्या परिपत्रकान्वये योजनांतर्गत योजनांसाठी ७५% एवढया मर्यादेत निधी वितरित करण्याबाबत दिलेल्या निदेशांस अनुसरून या शासन निर्णयान्वये सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., अकोला **या संस्थेस उर्वरित १५% म्हणजे रु.३,४५,०००/- लक्ष रक्कम वित्त विभागाने घातलेल्या अटींच्या अधीन राहून वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.** शासकीय भाग-भांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती संदर्भीय क्रमांक १ येथील दिनांक १२.१०.२००७ च्या शासन निर्णयातील (प्रत संलग्न) तरतूदींनुसार राहतील.

२. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या **रु.३,४५,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये तीन लाख पंचेचाळीस हजार फक्त)** या रकमेचा धनादेश

**"सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्यादीत, अकोला, जि. अकोला"**

**SAMYAK KRUSHI UTPADAK PRAKRIYA SAHAKARI SANSTHA LTD, AKOLA, DIST. AKOLA.**

या नांवाने काढण्यात यावा व सदर धनादेश संस्थेस वितरित करण्यात यावा.

३. वरीलप्रमाणे मंजूर केलेला शासकीय भाग-भांडवलाचा **रु.३,४५,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये तीन लाख पंचेचाळीस हजार फक्त)** चा खर्च **"मागणी क्र.व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च, (००) (१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका (०२) सहकारी संस्करण संस्था - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गंत योजना (०२) (०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भाग भांडवली अंशदान (कोल्हे समिती) (राज्य योजना) (४४२५ ०७५९) ३२, अंशदाने"** या लेखाशिर्षाखाली **सन २०१४-१५** च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. याव्यतिरिक्त सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., अकोला या संस्थेस शासकीय भाग-भांडवलाच्या परतफेडीसाठी नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारणा /बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील. त्याचप्रमाणे दिनांक २७.१.२०१५ च्या शासन निर्णयातील सर्व अटींचे व सूचनांचे पालन करणे संस्थेवर तसेच, संबंधित क्षेत्रिय कार्यालयांवर बंधनकारक राहील.

५. हे आदेश नियोजन तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ **क्रमांक ५९८/१४/व्यय-२, दिनांक ३१.१२.२०१४** अन्वये प्राप्त मान्यतेनुसार आणि संदर्भीय दिनांक ९.२.२०१५ च्या शासन परिपत्रातील सूचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०२१४५३२६४३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb Ishwar Sawant

Digitally signed by Balasaheb Ishwar Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Balasaheb Ishwar Sawant
Date: 2015.03.02 16:52:48 +05'30'

( बा.ई.सावंत )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव सचिव
३. मा.मंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
५. सर्व मा.विधीमंडळ सदस्य,
६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१३.व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टीटयूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११० ०१६.

१४.प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे. रोड, पुणे-१

१५.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे

१६.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

१७.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४३१) मंत्रालय, मुंबई

१८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई

१९.जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, अकोला

२०.लेखाधिकारी, पणन संचालनालय, म. रा. पुणे-१

२१.कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२२.अवर सचिव (२१-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२३.अध्यक्ष, सम्यक कृषि उत्पादक प्रक्रिया सहकारी संस्था मर्या., अकोला

२४.निवड नस्ती/(९स).